अहमदनगर जिल्ह्यातील अहमदनगर तालुक्यातील योजनाबाह्य/अवर्गीकृत रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## ग्रामविकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२५/प्र.क्र.१२/बांधकाम-५ (E-९५८१९३)

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई - ४००००१

तारीख: २२ एप्रिल, २०२५

**वाचा :-**

१) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२००८/प्र.क्र.०२/नियोजन-२, दि.२४ एप्रिल, २०१२

२) सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्रमांक रवियो-२०२३/प्र.क्र.१३१/नियोजन-२, दि.२१ जुलै, २०२३

३) ग्राम विकास विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः जिपर-२०२३/प्र.क्र.०१/बांधकाम-५, दि.०४ डिसेंबर, २०२३

४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्रमांकः का-५/साबांप्रादेविना/प्र.आ./दर्जोन्नत/ता.अहमदनगर/६७०३/सन-२५, दि.१० ऑक्टोबर, २०२५

५) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र क्रमांकः का-५/साबांप्रादेविना/प्र.आ./दर्जोन्नत/ता.अहमदनगर/२६४/सन-२०२५,दि.१४ जानेवारी, २०२५

**प्रस्तावना :-**

राज्यातील योजनाबाह्य/अवर्गीकृत रस्त्यांना ग्रामीण मार्ग म्हणून व ग्रामीण मार्गांना इतर जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबतची कार्यपध्दती व निकष संदर्भाधीन क्र.३ येथील शासन परिपत्रकान्वये निश्चित करण्यात आले आहेत.

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी संदर्भाधीन क्र. ४ व ५ येथील पत्रान्वये अहमदनगर जिल्ह्यातील अहमदनगर तालुक्यातील योजनाबाह्य रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना सन २००१-२१ मध्ये समाविष्ट करणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला

आहे. सदर प्रस्तावामध्ये मागणीकृत रस्त्याकरिता भुसंपादनाची आवश्यकता नसल्याचे व सदरहू रस्ता वन जमिनीतून जात नसल्याचे कार्यकारी अभियंता (बांधकाम-दक्षिण), जिल्हा परिषद, अहमदनगर, अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अहमदनगर व मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी प्रमाणित केले आहे. तसेच सदर रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजनेमध्ये समाविष्ट करणेबाबत जिल्हा परिषद, अहमदनगर यांनी मागणी केलेली आहे.

त्यानुसार सदर रस्त्याचा होणारा वापर तसेच जिल्हा परिषद, अहमदनगर यांचा ठराव विचारात घेता, सदरहू रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचा प्रस्ताव व जिल्हा परिषद, अहमदनगर यांचा ठराव विचारात घेऊन, अहमदनगर जिल्ह्यातील अहमदनगर तालुक्यातील खालील रस्ता ग्रामीण मार्ग म्हणून रस्ते विकास योजना सन २००१-२१ मध्ये समाविष्ट करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. सदर रस्त्याकरिता कोणत्याही प्रकारचे भूसंपादन अनुज्ञेय राहणार नाही.

| अ. क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | साखळी क्रमांक | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|
| **तालुका - अहमदनगर** | | | | |
| १ | मौजे- इसळक (प्रजिमा-१७२) ते अनामप्रेम (संस्था) ते स्नेहालय रस्ता | ०/०० ते ३/०० | ३.०० | ग्रामा-३७१ |
| | | **एकुण लांबी** | **३.००** | |

२. परिणामी रस्ते विकास योजना सन २००१-२१ मधील अहमदनगर जिल्ह्यातील ग्रामीण मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत खालीलप्रमाणे बदल होत आहे.

| अ.क्र. | रस्त्याचा दर्जा | दर्जोन्नती पुर्वीची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नत केलेली लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरची एकूण लांबी (कि.मी.) |
|---|---|---|---|---|
| १ | ग्रामीण मार्ग | १०१५१.९५ | (+) ३.०० | १०१५४.९५ |

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४२२१४४११९४५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2025.04.22 17:57:02 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
३. विभागीय आयुक्त, प्रादेशिक विभाग, नाशिक
४. जिल्हाधिकारी, अहमदनगर
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर
६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण
७. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना सन २००१-२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
८. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अहमदनगर (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना सन २००१-२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

**प्रत,**

१. उप सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय
२. अवर सचिव (नियोजन), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय
३. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अहमदनगर
४. कार्यकारी अभियंता (बांधकाम-दक्षिण), जिल्हा परिषद, अहमदनगर
५. रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय
६. निवडनस्ती (बांध-५)